**पाटबंधारे प्रकल्पांना विशिष्ट व्यक्तींची नावे दिली आहेत त्याचा उल्लेख शासन पत्रव्यवहारात करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन परिपत्रक क्र. विपआ-०३१०/१८/(३३९/२०१०) मोप्र-२
मंत्रालय, मुंबई-३२,
दि. ०८.०९.२०१०

**शासन परिपत्रक**

राज्यातील पाटबंधारे प्रकल्प मार्गी लावण्यामध्ये महत्वाच्या व्यक्तींनी बजावलेली भूमिका व प्रकल्प उभारणीतील योगदान विचारात घेऊन शासनाने ज्या ज्या प्रकल्पांना विशिष्ट व्यक्तींची नावे दिली आहेत ती सर्वसामान्य जनतेला माहीत असणे आवश्यक आहे. सदर नावांचा उल्लेख पत्रव्यवहारात करण्यात येत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. यास्तव अशा सूचना देण्यात येत आहेत की, ''ज्या ज्या पाटबंधारे प्रकल्पांना शासनाने विशिष्ट व्यक्तींची नावे दिली आहेत त्या प्रकल्पांबाबतच्या शासन पत्रव्यवहारात सदर नावाचा उल्लेख करण्यात यावा व याची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी''.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या (**www.maharashtra.gov.in**) संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१००९०८१७५२३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(मु.कि.वैरागडे)
शासनाचे उप सचिव

प्रत,
सर्व विधानसभा/विधान परिषद सदस्य, विधानमंडळ, विधानभवन, मुंबई-३२
महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (५ प्रतीत), मुंबई-३२
महालेखापाल (लेप/ले व अ) मुंबई/नागपूर
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व महसूली विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य
सर्व महामंडळ (५), जलसंपदा विभाग, महाराष्ट्र राज्य
सर्व मुख्य अभियंता (क्षेत्रिय स्तर), जलसंपदा विभाग, महाराष्ट्र राज्य
सर्व अधिक्षक अभियंता (क्षेत्रिय स्तर), जलसंपदा विभाग, महाराष्ट्र राज्य
यांनी आपल्या अधिनस्त असलेल्या सर्व विभाग व उपविभाग कार्यालये यांच्या निदर्शनास आणावे
सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
सर्व अधिकारी (तांत्रिक व अतांत्रिक), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व कार्यासने (तांत्रिक व अतांत्रिक), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
मोप्र-२ कार्यासन